**निरीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (गट-ब)**
**या संवर्गातील अधिकाऱ्याच्या मुदतपूर्व,**
**विनंती/ विशेष बदलीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांक :- इएसटी-१२२०/प्र.क्र.७३/राउशु-१,**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- १० ऑगस्ट, २०२०.

**शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या ४(५) मधील तरतुदीनुसार राज्य उत्पादन शुल्क विभागातील निरीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (गट-ब) या संवर्गातील खालील अधिकाऱ्याची, सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्व मान्यतेने मुदतपूर्व, विनंती/ विशेष कारणास्तव बदली करण्यात येत असून, त्यांची पदस्थापना खालील स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे पद | नवीन पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. पी. ए. घायवट | अ-विभाग, औरंगाबाद | मे. अलाईड ब्लेंडर ॲन्ड डिस्टिलरी, चिखलठाणा, औरंगाबाद (श्री. के. एम. जाधव यांच्या दि.३०.०९.२०२० रोजी सेवानिवृत्तीने रिक्त होणाऱ्या पदी) |
| २ | श्री. बी. बी. हुलगे | श्रीगोंदा स.सा.का., श्रीगोंदा, जि.अहमदनगर | श्रीरामपूर, अहमदनगर (श्री. यु.पी. बर्डे, यांच्या दि.३१.०८.२०२० रोजी सेवानिवृत्तीने रिक्त होणाऱ्या पदावर) |

२. श्री. पी. ए. घायवट, निरीक्षक, राउशु यांनी सद्य:पदावरून दि.३०.०९.२०२० (म.नं.) रोजी कार्यमुक्त होउन बदलीच्या पदावर दि.१.१०.२०२० (म.पू.) रोजी कोणत्याही वेगळ्या आदेशाची प्रतिक्षा न करता रूजू व्हावे.

३. श्री. बी. बी. हुलगे, निरीक्षक, राउशु यांनी सद्य:पदावरून दि.३१.०८.२०२० (म.नं.) रोजी कार्यमुक्त होउन बदलीच्या पदावर दि.१.०९.२०२० (म.पू.) रोजी कोणत्याही वेगळ्या आदेशाची प्रतिक्षा न करता रूजू व्हावे.

४. सदरचे आदेश हे बदली तसेच कार्यमुक्तीचे आदेश असून आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांनी किंवा क्षेत्रीय अधिकाऱ्यांनी स्वतंत्र आदेश निर्गमित करण्याची आवश्यकता नाही. सदर अधिकाऱ्यांनी पदभार स्वीकारल्यानंतर त्याबाबतचा अहवाल शासनास तात्काळ सादर करावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये.

५. सदर आदेशातील अधिकाऱ्यांना कोणताही बदली भत्ता व पदग्रहण अवधी अनुज्ञेय असणार नाही.

६. बदलीच्या आदेशात बदल करून घेण्यासाठी जर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी

असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधित अधिकाऱ्यांविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००८१०११४२३६५१२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

YUVRAJ BAYAJI AJETRAO

Digitally signed by YUVRAJ BAYAJI AJETRAO
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a34e563dd43e83b04db3eb31230d59c1af4b6e29ee6c1f13e338b0ccd51689af, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=c01c962d08bd39997d4c4d6e7e19f8acf340d1a5c4dd2b9a00977369607bbf82, ou=HOME DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=YUVRAJ BAYAJI AJETRAO
Date: 2020.08.10 19:54:23 +05'30'

**( यु. ब. अजेटराव )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति:**

१) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३) सर्व विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क (मार्फत आयुक्त, राउशु, महाराष्ट्र राज्य, मुंबई.)
४) सबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) संबंधित अधिकारी (मार्फत आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.)
७) निवडनस्ती (राउशु-१).

************